सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेमधील "पाटबंधारे व पूर नियंत्रण" हे विकास क्षेत्र गाभा क्षेत्रात आणण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डिएपी-१०१५/प्र.क्र. ४८/ का. १४८१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२
तारीख: ३० मार्च, २०१५

प्रस्तावना :-

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे), अधिनियम, १९९८ प्रसिध्द झाल्याने व त्यातील तरतूदीनुसार राज्यात जिल्हा नियोजन समित्या गठीत करण्यात आल्याने सन २००८-०९ पासुन सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेचे कामकाज नियोजन विभागाकडे वर्ग करण्यात आले. त्यानुषंगाने जिल्हा वार्षिक योजनेच्या सुधारीत कार्यपध्दती बाबत शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. जिवायो १००७/ प्र.क्र. ३९/ का.१४४४, दि. १६/२/२००८ निर्गमित करण्यात आला. सन २००८-०९ पूर्वी जिल्हा योजनांचे कामकाज संबंधीत प्रशासकिय विभागांव्दारे हाताळण्यात येत होते. सन २००८-०९ मध्ये विविध विभागांच्या सुमारे ४७२ जिल्हा योजना होत्या. तथापि, उपरोक्त शासन निर्णान्वये विहित केलेल्या सुधारीत कार्यपध्दती नुसार जिल्हा वार्षिक योजनेची अंमलबजावणी करताना काही त्रूटी/अडचणी निदर्शनास आल्याने व त्या दूर करणे निकडीचे असल्याने या विषयी सखोल अभ्यास करून शिफारस करण्याकरिता जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या अध्यखतेखाली शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.जिवायो-१००९/ प्र.क्र.२४/ का.१४४४, दि. २४/८/२००९ अन्वये अभ्यास गटाची स्थापना करण्यात आली. सदर अभ्यास गटाने या संदर्भात सखोल अभ्यास करून शासनास अहवाल तथा शिफारशी सादर केल्यानुसार सन २००९-१० च्या जिल्हा वार्षिक योजनेचा मध्यावधी आढावा दि. ५/१०/२००९ ते दि. ८/१०/२००९ या कालावधीत तत्का. प्रधान सचिव (नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली सर्व प्रशासकिय विभागांच्या सचिवांबरोबर बैठकीत घेण्यात आला. सदर आढाव्याअंती (१) जिल्हा योजनांची सुधारीत यादी, (२) जिल्हा वार्षिक योजना, सन २०१०-११ चे प्रारूप आराखडे तयार करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांमध्ये "नाविन्यपूर्ण योजना" अशी नवीन योजना सुरू केल्याबाबत, (३) जिल्हा योजनेतील योजनांचे वर्गीकरण, गाभा क्षेत्र व बिगर गाभा क्षेत्र इत्यादी व इतर महत्वाच्या व उपयुक्त शिफारशींना शासनाने मान्यता दिली. त्यानुसार जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत खालील नमूद विकास क्षेत्रांची विभागणी **गाभा क्षेत्र व बिगर गाभा क्षेत्र** अशी करण्यात येऊन सर्व जिल्हा योजना या विकास क्षेत्रांतर्गत पुढीलप्रमाणे विभागलेल्या आहेत :-

| गाभा क्षेत्र (Core Group) | बिगर गाभा क्षेत्र (Non- Core Group ) |
|---|---|
| कृषी व संलग्न सेवा | उर्जा |
| ग्राम विकास | उद्योग व खाण |
| सामाजिक व सामुहिक सेवा | परिवहन |
| | पाटबंधारे व पूर नियंत्रण |
| | सामान्य सेवा |
| | सामान्य आर्थिक सेवा |

तथापि, राज्यात जलयुक्त शिवार अभियान मोठया प्रमाणात राबविण्यास सुरूवात झाली असून यात प्रामुख्याने लघुपाटबंधारे योजनेचा समावेश होतो. सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत मंजूर करण्यात येणारा निधी हा गाभा क्षेत्रासाठी २/३ तर बिगर गाभा क्षेत्रासाठी १/३ या प्रमाणात ठेवण्यात येतो. बिगर गाभा क्षेत्रात रस्ते तसेच मोठया भांडवली खर्चाच्या योजनांचा समावेश असल्याने पाटबंधारे व पूर नियंत्रण विकास क्षेत्रासाठी निधी उपलब्ध करण्यास मर्यादा येतात. परिणामी, लघुपाटबंधारे योजनांसाठी मोठया प्रमाणात निधीची मागणी असताना देखील कमी प्रमाणात तरतूद उपलब्ध होत असते. सबब, सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेतील **"पाटबंधारे व पूर नियंत्रण"** हे विकासक्षेत्र **"बिगर गाभा क्षेत्र" ऐवजी "गाभा क्षेत्र"** मध्ये समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजना अंतर्गत बिगर गाभा क्षेत्रामधील **"पाटबंधारे व पूर नियंत्रण"** हे विकास क्षेत्र **"बिगर गाभा क्षेत्र"** ऐवजी **"गाभा क्षेत्र"** अंतर्गत त्वरीत प्रभावाने आणण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजना अंतर्गत विकास क्षेत्रांची सुधारीत विभागणी खालीलप्रमाणे राहील.

| **गाभा क्षेत्र ( Core Group )** | **बिगर गाभा क्षेत्र ( Non- Core Group )** |
|---|---|
| कृषी व संलग्न सेवा | उर्जा |
| ग्राम विकास | उद्योग व खाण |
| सामाजिक व सामुहिक सेवा | परिवहन |
| पाटबंधारे व पूर नियंत्रण | सामान्य सेवा |
| | सामान्य आर्थिक सेवा |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१०५३३१६११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: CN = Arunkumar S Belgudri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Planning Department
Date: 2015.03.30 16:17:46 +05'30'

**(अ.शि.बेळगुद्री)**
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
२. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव,

५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. महालेखापाल महाराष्ट्र-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई/ नागपूर
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३.सर्व विभागीय आयुक्त,
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.नियोजन विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,मंत्रालय, मुंबई
१६.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१७.सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालये,
१८.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये,
१९.निवड नस्ती (का-१४८१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.